महाराष्ट्र राज्यातील लघु व मध्यम उपक्रमांना
शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वितरीत करण्यात
येणाऱ्या कोळशाच्या वाटपाबाबत मार्गदर्शक तत्वे.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. कोळसा-२०१४/प्र.क्र.२७५/उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १२ जुलै, २०१६

**संदर्भ :-** शासन परिपत्रक क्र. कोळसा-२००९/प्र.क्र.२९/उद्योग-७, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ०७ नोव्हेंबर, २००९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या नविन कोळसा वितरण धोरणानुसार राज्यातील वार्षिक ४२०० मे. टन वापर असणाऱ्या सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना कोळसा वितरण करण्यासाठी संदर्भाधिन परिपत्रकानुसार सविस्तर निर्देश निर्गमित करण्यात आले होते. त्यामध्ये आवश्यक सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सबब संदर्भाधिन परिपत्रक अधिक्रमित करुन खालील सुधारणा करण्यात येत आहेत.

या निर्देशांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर :-

(१) "यंत्रणा" यांचा अर्थ "शासन नियुक्त यंत्रणा" असा होतो.

(२) "उद्योग घटक" याचा अर्थ महाराष्ट्र राज्यातील उद्योग संचालनालय व त्यांच्या क्षेत्रीय कार्यालयाकडे पंजीकृत लघु व मध्यम असे उद्योग घटक असा आहे.

(३) "इंधन पुरवठा करारनामा" याचा अर्थ केंद्र शासनाच्या कोळसा वितरण धोरण दिनांक १८/१०/२००७ अंतर्गत यंत्रणेने कोळसा कंपनी सोबत कोळसा मिळण्याकरिता केलेला करारनामा तसेच कोळसा पुरवठ्यासाठी उद्योग घटकांसोबत केलेला इंधन पुरवठा करार असा आहे.

(४) "कोळसा कंपनी" याचा अर्थ महाराष्ट्र शासनास मे. कोल इंडिया लि. यांच्यामार्फत आवंटित केलेला कोळसा पुरवठा करणाऱ्या कोळसा कंपन्या असा आहे.

## शासन निर्णय

राज्यातील वार्षिक ४२०० मे. टन वापर असणाऱ्या लघु व मध्यम उपक्रमांना कोळसा वितरण करण्यासाठी शासन स्वतंत्र आदेशाद्वारे शासन नियुक्त यंत्रणेची विहीत कालावधीसाठी नियुक्ती करेल.

**२) कोळसा प्राप्त करण्याकरिता पात्र उद्योग घटक :-**

जिल्हा उद्योग केंद्राकडे स्थायी नोंदणीकृत लघु व मध्यम उपक्रम, वीट उत्पादक उपक्रम वगळून उर्वरित उपक्रमांमध्ये घटकास आवश्यक संपूर्ण वीज पुरवठा महाराष्ट्र राज्य वीज वितरण किंवा इतर अधिकृत (Liceneced) विद्युत पुरवठादारांकडून संपूर्ण औद्योगिक विद्युत पुरवठा जोडणी असलेले उपक्रम कोळशाचे वाटप करण्याकरिता पात्र समजण्यात येतील.

**३) कोळसा प्राप्त करण्याकरिता अर्ज करावयाची पद्धत :-**

राज्यातील उद्योग घटकांसाठी मे. कोल इंडिया लि. यांच्याकडून कोळशाच्या वाटपाकरिता आवंटन प्राप्त झाल्यानंतर कोळसा प्राप्तीसाठी शासन नियुक्त यंत्रणेमार्फत मोठ्या खपाच्या किमान दोन राज्यस्तरीय

वृत्तपत्रात जाहीरात देवून पात्र उद्योग घटकांकडून अर्ज मागविण्यात येतील. अर्जाचा नमुना (परि-१) शासन नियुक्त यंत्रणेच्या अथवा उद्योग संचालनालयाच्या क्षेत्रिय कार्यालयाकडून प्राप्त करुन घेता येतील. तसेच हा नमुना उद्योग संचालनालयाच्या कार्यालयीन संकेतस्थळावर उपलब्ध असेल. ज्या उद्योगधारकांना ऑनलाईन अर्ज सादर करावयाचे आहेत त्यांनी ऑनलाईन अर्ज करताना खालील प्रमाणे सर्व प्रमाणित अथवा स्वयं प्रमाणित (Self-attested) कागदपत्रे स्कॅन करुन अपलोड करणे अनिवार्य आहे. तसेच सर्व कागदपत्रांचा एक संच पडताळणीसाठी संबंधित जिल्हा उद्योग केंद्राला व शासन नियुक्त यंत्रणेला सादर करावा.

| अ.क्र. | अर्जासोबत सादर करावयाची कागदपत्रे | विट उत्पादक उद्योग घटक | इतर सर्व उद्योग घटक |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | जिल्हा उद्योग केंद्राकडे स्थायी उद्योग घटक म्हणून नोंदणीचे प्रमाणपत्र - ग्राह्य ज्ञापन स्वीकृती | होय | होय |
| २. | रु. १००/- च्या मुद्रांक पेपरवर नोटराईज केलेले शासन नियुक्त यंत्रणेने निर्धारीत केलेल्या नमुन्यात अथवा स्वयंप्रमाणित शपथपत्र (सोबत जोडलेल्या विहीत नमुन्यात परिशिष्ट-२) | होय | होय |
| ३. | घटकास यापूर्वी मागील ½ वर्षात कोळसा वितरणासाठी निर्धारण केले असल्यास सदर निर्धारणाचे प्रमाणपत्र. (असल्यास) | होय | होय |
| ४. | एमएसएमई/RITES/VNIT अथवा विकास आयुक्त (उद्योग) यांनी मान्यता दिलेल्या संस्थेचे कोळसा निर्धारण व प्रती बाबत प्रमाणपत्र (सोबत जोडलेल्या विहीत नमुन्यात परिशिष्ट-३) | नाही | होय |
| ५. | विक्रीकर नोंदणीची प्रत (लागु असल्यास)* | होय | होय |
| ६. | चार्टर्ड इंजिनियर यांनी प्रमाणित केलेली प्लॉट व मशिनरीची यादी | नाही | होय |
| ७. | लेखा परिक्षण झालेले गत ३ वर्षाचे ताळेबंद अहवाल *(लागु असल्यास) | नाही | होय |
| ८. | पॅनकार्डची प्रत | होय | होय |
| ९. | उपक्रमाच्या मुख्य प्रवर्तकाची आधार कार्डची प्रत | होय | होय |
| १०. | गत ३ महिन्याच्या वीज देयकाच्या प्रती | नाही | होय |
| ११. | जागा भाडे तत्त्वावर घेतली असल्यास अशा भाडे तत्त्वावर घेतलेल्या जागेचा करारनामा जागेच्या मालकीचा पुरावा - Saledeed व ७/१२ अथवा MIDC चे Lease deed | होय | होय |
| १२. | गौण खनिज उत्खनन परवान्याची प्रत. (स्थायी वीट उत्पादक उद्योग घटकास खनिकर्म विभागाकडे केलेला करारनामा व अंतरिम आदेशाची प्रत सादर करावी लागेल) | होय | नाही |
| १३. | गौण खनिज शुल्क भरल्याची पावती (स्थायी वीट उत्पादक उद्योग घटकांकरिता मागील तीन वर्षाच्या पावत्या) | होय | नाही |

| | | | |
|---|---|---|---|
| १४. | शासन नियुक्त यंत्रणेच्या संकेतस्थळावर उद्योग घटकांनी ऑनलाईन पद्धतीने रु. १०,०००/- एकाच वेळेस तर विटभट्टी घटकांनी रु. १,०००/- एकाच वेळेस नोंदणी शुल्क भरण्यात यावेत. | होय | होय |
| १५. | महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाचा उत्पादन सुरु करण्याचा वैध परवाना. (Consent to operate) MPCB च्या Consent to operate मध्ये कोळसा वाटप व मात्रा नमूद केले आहे का ते तपासणे. | नाही | होय |
| -* स्थायी गौण खनिज परवाना असणाऱ्या विट उत्पादक उद्योग घटकांस अ.क्र. ५ व ७ मध्ये नमूद केलेली कागदपत्रे अर्जासोबत जोडणे अनिवार्य राहील. | | | |

वृत्तपत्रातील जाहीरातीमध्ये नमूद केलेल्या विहीत मुदतीमध्ये संपूर्ण कागदपत्रासह प्राप्त झालेल्या अर्जाचा कोळसा वाटप करण्यासाठी विचार करण्यात येईल.

उद्योगांना (विट उत्पादक घटक सोडून) त्यांच्या उत्पादनासाठी आवश्यक कोळशाचे निर्धारण (Quantity) व प्रत (Grade) यांची निश्चिती संबंधित उद्योग घटकाने एमएसएमई/राईट्स/विश्वेश्वर नॅशनल इंजिनिअरींग कॉलेज (VNIT) व इतर वेळोवेळी विकास आयुक्त (उद्योग) यांनी मान्यता दिलेल्या शासन मान्यता प्राप्त तांत्रिक संस्थेमार्फत करुन घ्यावी. याकरिता लागणारी सर्व प्रक्रिया व खर्च उद्योगधारकांना करावी लागेल. सदर तांत्रिक संस्थांनी, उद्योग घटकाने अर्ज केल्यापासून ३० दिवसाच्या आत, परिशिष्ट-३ मध्ये आपला अहवाल घटकास देणे आवश्यक राहील. सदर निर्धारणाकरिता तांत्रिक संस्थेस आवश्यक वाटल्यास उद्योग घटकांची ओळख (Identification) करिता संबंधित जिल्हा उद्योग केंद्राची मदत घेतील. अर्जदार उद्योग घटकास कोळशाची मात्रा व क्षमता निर्धारण या शासन आदेशाच्या दिनांकानंतर करुन घ्यावी लागेल.

क्षमता निर्धारणाकरिता तांत्रिक संस्थेसोबत घटकाची ओळख पटविण्यास व घटक चालू आहे किंवा कसे या बाबींची तपासणी करण्याकरिता जिल्हा उद्योग केंद्र व शासन नियुक्त यंत्रणेचे प्रतिनिधी राहतील. भेटीचे वेळी सर्व सूचक आणि डिजीटल (यंत्रसामुग्रीचे, उद्योग घटकांची, कर्मचारी व कामगारवृंदांची) छायाचित्रे घेण्यात यावीत व सदर अभिलेख स्थायी स्वरुपात शासन नियुक्त यंत्रणेकडे/ जिल्हा उद्योग केंद्राकडे ठेवण्यात यावा. मात्रा व क्षमता निर्धारण प्रमाणपत्र प्राप्त झाल्यावर, त्यानुसार घटकास कोळसा वाटप करण्याबाबत जिल्हास्तरीय समिती वाटपाकरिता शासन नियुक्त यंत्रणेला शिफारस करेल. मात्रा व क्षमता निर्धारण प्रमाणपत्राची वैधता तीन वर्ष राहील.

अस्थायी गौण खनिज परवाना असणाऱ्या विट उत्पादक घटकांना प्रती १०० ब्रास मातीकरिता ३५ मॅट्रीक टन कोळसा याप्रमाणे माहे ऑक्टोबर ते मे या कालावधीकरिता द्यावा. घटकाने प्रत्यक्ष प्रदान केलेल्या स्वामित्व धन रक्कम नुसारच कोळसा वाटप करावा.

### ४) जिल्हा स्तरीय वाटप समिती :-

उद्योग घटकाने सादर केलेल्या कागदपत्राची छाननी करण्यासाठी महाराष्ट्र शासन नियुक्त यंत्रणेमार्फत सर्व प्राप्त अर्ज परिशिष्ट-४ मधील नमुन्यात जिल्हा स्तरीय वाटप समिती पुढे मान्यतेसाठी सादर करेल.

जिल्हा स्तरीय वाटप समिती खालील प्रमाणे गठीत करण्यात यावी.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र. | - | अध्यक्ष |
| २) | जिल्हा खनिकर्म अधिकारी | - | सदस्य |
| ३) | संबंधित जिल्हाधिकारी यांनी नामनिर्देशित केलेला तहसिलदार संवर्ग अधिकारी | - | सदस्य |
| ४) | शासन नियुक्त यंत्रणेचा प्रतिनिधी | - | निमंत्रक |

४.१ उपरोक्त समितीच्या निर्णयानुसार पात्र उद्योग घटकांकडून सुरक्षा अनामत ठेव रक्कम शासन नियुक्त यंत्रणेकडे ECS/RTGS द्वारे स्वतंत्र बँक खात्यामध्ये जमा केली जाईल. यासाठी राष्ट्रीयीकृत बँकेत स्वतंत्र खाते शासन नियुक्त यंत्रणेकडून उघडले जाईल. तद्नंतर शासन नियुक्त यंत्रणेकडून पात्र उद्योग घटकांकरिता कोळसा वाटपाची Delivery Order दिली जाईल. उद्योग घटकाने ह्या Delivery Order च्या आधारे WCL/CIL कडून निश्चित केलेल्या खाणीतून कोळसा प्राप्त करुन घ्यावा. त्यासाठी शासन नियुक्त यंत्रणेने अन्य Handling Agency ची नियुक्ती करु नये. कोळसा प्राप्त झाल्यानंतर याबाबतची पोचपावती उद्योग घटकाने शासन नियुक्त यंत्रणेकडे द्यावी. (त्याची प्रत स्वत:कडे ठेवून घ्यावी.) व त्याचा ताळमेळ शासन नियुक्त यंत्रणेने घालावा व त्याचा तपशील जिल्हा उद्योग केंद्राकडे सादर करावा.

उद्योग घटकाने कोळसा वाटपाबाबतचे स्वयंघोषित प्रमाणपत्र द्यावे. उद्योग घटकांची तांत्रिक तपासणी ६ महिन्याच्या आत करणे बंधनकारक आहे. या मुदतीत तांत्रिक तपासणी न झाल्यास कोळसा पुरवठा बंद करावा. तसेच काही अनियमितता घडू नये म्हणून पुरेशी अनामत रक्कम घ्यावी.

४.२ या संदर्भात उद्योग घटकांकडून प्राप्त सुरक्षा अनामत ठेव रक्कम तसेच CIL/WCL कडे जमा करावयाची रक्कम कोळसा वाटपाचा तपशील राखणे ही जबाबदारी संबंधित शासन नियुक्त यंत्रणेची राहील.

४.३ पात्र उद्योग घटकांची यादी, त्यांना अनुज्ञेय कोळसा, प्रत्यक्षात वाटप केलेला कोळसा, उद्योग घटकांकडून प्राप्त केलेली सुरक्षा ठेव अनामत रक्कम, उद्योग घटकांनी वापर केलेल्या कोळशाची मात्रा, उद्योग घटकांनी जमा केलेल्या कागदपत्रांची माहिती, उद्योग घटकांच्या आस्थापनांचे, यंत्रसामुग्रीचे व अधिकारी / कर्मचाऱ्यांचे डिजीटल फोटो शक्य झाल्यास छायाचित्रण (Video Recording) या सर्व बाबी तसेच वेळोवेळी शासन निर्देश देईल अशा बाबी शासन नियुक्त यंत्रणा व जिल्हा उद्योग केंद्रामार्फत संगणक संकेतस्थळावर प्रसिद्ध करावी व वेळोवेळी सदर माहिती अद्ययावत करावी.

**५) <u>कोळसा वाटपाकरिता निर्देश</u> :-**

५.१ उद्योग घटकांची, तांत्रिक संस्था (जसे एमएसएमई इ.) यांनी तपासणी केल्यानंतर त्यांनी शिफारस केलेल्या प्रतीचा कोळसा देण्याकरिता प्रथम विचार करण्यात यावा. तांत्रिक समितीने शिफारस केलेल्या प्रतीचा कोळसा शासन नियुक्त यंत्रणेकडे उपलब्ध नसल्यास त्या प्रतीच्या जवळच्या उपलब्ध प्रतीचा (Grade) कोळसा देण्यात येईल.

५.२ विट उत्पादक उद्योग घटकांना स्लॅक प्रतीचा कोळसा वाटप करण्यात येईल.

५.३ कोळसा कंपनीमार्फत शासन नियुक्त यंत्रणेस आवंटित करण्यात येणाऱ्या एखाद्या प्रतीच्या कोळशाची मात्रा अथवा ज्या खाणीतून कोळसा पुरवठा करण्यात येणार आहे ती खाण निश्चित नसल्यामुळे अशा प्राप्त प्रतीच्या कोळशाचे अथवा कोळसा खाणीचे, संबंधित उद्योग घटकांना वाटप करताना त्या खाणीच्या नंतर

लगतच्या खाणीच्या उपलब्ध प्रतीची निश्चिती करेल आणि उद्योग घटकांना लागणारा कोळसा ज्या जवळच्या खाणीवर उपलब्ध असेल त्या खाणीवरुन शासन नियुक्त यंत्रणेस वाटप करण्यात येईल. या कामाकरिता शासन नियुक्त यंत्रणा लवकर स्वयंचलित संगणीकृत प्रणाली तयार करेल.

५.४ उद्योग घटकांना कोळशाचे वाटप करताना उद्योग घटक ज्या जिल्ह्यांमध्ये आहेत त्या जिल्ह्यातील जवळच्या खाणीचा विचार करण्यात येईल. लघु उद्योग घटक असलेल्या जिल्ह्यातील खाणीमध्ये पुरेसा कोळसा उपलब्ध नसेल तर अशा लघु उद्योग घटकांना बाजुच्या जिल्ह्यातील खाणीतून कोळसा वाटप करण्याचा प्रयत्न करण्यात येईल.

५.५ शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वाटप करण्यात येणारा कोळसा हा कंपनीने शासन नियुक्त यंत्रणेस ज्या प्रकारचा कोळसा आवंटित केला आहे. त्यावर अवलंबून असल्यामुळे एखाद्या उद्योग घटकास लागणाऱ्या प्रतीचा कोळसा जर कोळसा उत्पादन करणाऱ्या कंपनीने शासन नियुक्त यंत्रणेस आवंटित केला नसेल तर त्याच प्रतीचा कोळसा उद्योग घटकांना पुरविणे हे शासन नियुक्त यंत्रणेवर बंधनकारक राहणार नाही.

५.६ शासन नियुक्त यंत्रणेची मागणी व वेस्टर्न कोल्ड फिल्ड (WCL) ने उपलब्ध करुन दिलेली मात्रा यात तफावत असल्यास Pro-rata पद्धतीने वाटप करण्यात यावे.

५.७ शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वाटप करण्यात येणाऱ्या कोळशाची वाहतूक करणाऱ्या वाहनांकरिता GPS प्रणाली लवकरात लवकर विकसित करण्यात येवून या प्रणाली आधारे कोळसा खाणीपासून उपक्रमापर्यंत करण्यात येणारी कोळशाची वाहतूक संनियंत्रित करण्याबाबत सविस्तर आराखडा शासन नियुक्त यंत्रणेने विकसित करावा. तसेच त्या आराखड्याचा अंमल लवकरात लवकर करावा.

## ६) वितरीत केलेल्या कोळशाच्या वापराबाबत तपासणी :-

शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वितरीत होणाऱ्या कोळशाचा उद्योग घटक त्यांच्या स्वतःच्या उत्पादनाकरिता वापर करतात अथवा नाही यावर नियंत्रण ठेवण्याकरिता काही कालावधीच्या अंतराने तपासणी, संनियंत्रण करण्याकरिता शासन नियुक्त यंत्रणेस खालील प्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत.

६.१ कोळशाच्या वापराची तपासणी करण्याकरिता संबंधित जिल्हा उद्योग केंद्राने पर्यवेक्षकीय पथकाची स्थापना करावी. तपासणी पथकामध्ये खालील प्रमाणे सदस्यांचा समावेश असेल.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातील तज्ञ प्रतिनिधी | - | अध्यक्ष |
| २) | जिल्ह्यातील नामवंत मान्यताप्राप्त अशासकीय संस्थांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३) | मान्यताप्राप्त औद्योगिक संघटनाचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ४) | जिल्हा उद्योग केंद्राचा प्रतिनिधी | - | सदस्य |
| ५) | शासन नियुक्त यंत्रणेचा प्रतिनिधी | - | निमंत्रक |

(उपरोक्त १ व २ येथील नमूद अध्यक्ष व सदस्यांना प्रती युनिट रु. २,०००/- (रु. दोन हजार) मानधन देण्यात यावे.) रु. २,०००/- ही मानधनाची रक्कम व प्रत्यक्ष प्रवासासाठी वाहन खर्च शासन नियुक्त यंत्रणेमार्फत केला जाईल.

६.२ तपासणीची कार्यपद्धती :-

(अ) शासन नियुक्त यंत्रणेने कोळसा वापराबाबत तपासणी करावयाची उद्योग घटकांची यादी उपरोक्त तपासणी पथकास कळवावी. पथकास कळविताना उद्योग घटकांच्या यादीसोबत त्यांना शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वाटप करण्यात आलेला कोळशाची मात्रा व तो कुठल्या तारखेस वाटप केला आहे, तांत्रिक संस्थेच्या अहवालानुसार उद्योग घटक उत्पादन करीत असलेल्या उत्पादनात प्रती युनिट लागणारा कोळसा तसेच संबंधित कालावधीत उपक्रमाने उत्पादनास वापरलेले विजेचे युनीटबाबत सविस्तर माहिती तपासणी पथकास देणे बंधनकारक राहील. सदर माहितीची पडताळणी करुन शासन नियुक्त यंत्रणेकडून प्राप्त यादीतील संगणकीकृत स्वैर पद्धतीने प्रत्येक ६ महिन्यात कमीत-कमी १०% तसेच वार्षिक २०%, एवढ्या उद्योग घटकांची तपासणी प्रत्येक जिल्हानिहाय पथकाकडून करण्यात येईल. सदर तपासणी पथक ज्या जिल्ह्यामध्ये स्थापन झाले असेल त्यांनी तो जिल्हा वगळून लगतच्या जिल्ह्यामध्ये तपासणी करावी.

गरजेनुसार वरील तपासणी पथक रासायनिक पृथ:करणाकरिता कोळशाचे नमुने घेऊ शकतील. त्याचप्रमाणे गरजेनुसार तपासणी पथक छायाचित्र सुद्धा घेऊ शकतील. वाटप केलेल्या कोळशाचा गैरवापर केल्याचे स्पष्ट झाल्यास, तपासणी पथकाच्या सूचनेनुसार शासन नियुक्त यंत्रणेकडून घटकास पुढील कोळसा वितरण बंद करण्यात येईल. तसेच घटकाची सुरक्षा ठेव शासन नियुक्त यंत्रणेद्वारे जप्त करण्यात येईल व लागू कायद्या अंतर्गत कार्यवाहीस घटक पात्र ठरेल.

(ब) शासन नियुक्त यंत्रणेकडून तपासणी पथकास माहिती प्राप्त झाल्यांनतर उद्योग घटकाच्या तपासणीबाबतचा अहवाल परिशिष्ट-५ मध्ये तपासणीच्या डिजीटल फोटोसह तपासणी झाल्यापासून कार्यालयीन ३ दिवसांच्या आत संगणक संकेतस्थळावर शासन नियुक्त यंत्रणेस प्रसिद्ध करणे बंधनकारक राहील. तपासणी दरम्यान वाटप करण्यात आलेला पूर्ण कोळसा वापरण्यात आला नाही अथवा नोंदवही तपासणी पथकास तपासणीसाठी सादर न केल्यास, वाटप करण्यात आलेला कोळसा उद्योगधारकांनी दुसऱ्या कोणत्याही कारणास्तव उपयोगात वापरण्यात येणार नाही तसेच विक्री सुद्धा करता येणार नाही. असे आढळल्यास अशा उद्योग घटकांचा इंधन पुरवठा करारनामा रद्द करुन त्यापोटी जमा केलेली सुरक्षा ठेव अनामत रक्कम जप्त करण्याचा अधिकार शासन नियुक्त यंत्रणेस राहील. तद्नंतर उद्योग घटकांचे नाव काळ्या यादीत समाविष्ट करुन त्यांच्यावर योग्य ती कायदेशीर कार्यवाही करण्याचे अधिकार शासन नियुक्त यंत्रणेस राहतील. आर्थिक वर्षा अखेर जप्त केलेली सुरक्षाठेव अनामत रक्कम संपूर्ण तपशिलासह संबंधित शासन नियुक्त यंत्रणेकडे धनादेशाद्वारे जमा करावी.

(क) कोळसा वितरण/वापर संदर्भात प्राप्त झालेल्या तक्रारीची शहानिशी तपासणी पथकाकडून केली जाईल. तक्रारदार या संदर्भात संकेतस्थळावर तक्रार करु शकतात. तथापि, तपासणी शुल्क रु. १,०००/- (रु. एक हजार) तक्रारदारास शासन नियुक्त यंत्रणेकडे ECS/RTGS द्वारे भरावे लागेल. तक्रारदाराने विहीत तपासणी शुल्क भरल्यानंतर १५ दिवसांत चौकशी करुन संबंधितांना लेखी कळविले जाईल. तक्रारदाराचे नाव गोपनीय ठेवले जाईल. चौकशीत तथ्य आढळून न आल्यास रु. १,०००/- (रु. एक हजार) तपासणी शुल्क जप्त केले जाईल. चौकशीअंती तक्रारीत तथ्य आढळल्यास रु. १०,०००/- (रु. दहा हजार) तक्रारदारास शासन नियुक्त यंत्रणेमार्फत दिले जातील.

## ७. उद्योग घटकांची कर्तव्ये :-

७.१ उद्योग घटकाने किती कोळसा कोणत्या ट्रकने प्राप्त केला याबाबतची माहिती दर महिन्याला शासन नियुक्त यंत्रणेच्या संकेतस्थळावर भरावी. त्यासाठी Code शासन नियुक्त यंत्रणा देईल. कोळसा वापराबाबत आवश्यक माहिती दर महिन्याला सुधारणा (Update) करेल. तसेच रकमांचा भरणा विषयक तपशील, किती कोळशाची मात्रा कोणत्या खाणीमधून उचलली याची माहिती उद्योग घटक शासन नियुक्त यंत्रणेच्या संकेतस्थळावर भरेल. उद्योगधारकाकडून शासन नियुक्त यंत्रणेद्वारे मागविण्यात येणाऱ्या तांत्रिक विवरणाबाबतची माहिती दर महिन्यास शासन नियुक्त यंत्रणेस ऑनलाईन सादर करावी. जो पर्यंत उद्योग घटक सदर माहिती सादर करणार नाही तो पर्यंत पुढील कोळसा वाटप होणार नाही.

७.२ उद्योग घटकांना सोबत दिलेल्या विहीत नमुन्यात (परिशिष्ट-VI) शासन नियुक्त यंत्रणेकडून प्राप्त कोळसा व त्यांच्या वापरासाठी नोंदवही त्यांच्या उत्पादनाच्या ठिकाणी ठेवावी लागेल. तसेच दर तीन महिन्यानंतर १५ दिवसाचे आत त्याची प्रमाणित प्रत शासन नियुक्त यंत्रणेस सादर करणे आवश्यक आहे. तपासणी पथकास तपासणी दरम्यान उद्योग घटकाने ही नोंदवही उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

७.३ वर्ष संपल्यांनतर उद्योगधारकांनी आर्थिक वर्षात पुरवठा झालेल्या निर्धारण (Quantity) व प्रत (Grade) याबाबतचे विवरण जिल्हा उद्योग केंद्रास वाटप समितीच्या शिफारशीच्या माध्यमातून सादर करावा.

## ८. इतर :-

८.१ सर्व संस्था जसे की, MSME/DIC/RITES/VNIT/ शासन नियुक्त यंत्रणा इत्यादी कोळसा वाटपातील त्याची जबाबदारी स्वत: पार पाडतील. बाहेरील व त्रयस्थ संस्थेकडून कोणतेही काम Outsource करण्यात येऊ नये.

८.२ शासन नियुक्त यंत्रणा उद्योग घटकांना त्यांचे यंत्रणेमार्फत कोळसा वितरणाचे काम करेल त्यासाठी अन्य Handling Agency लावणार नाही.

८.३ केंद्र शासनाच्या नविन कोळसा वितरण धोरण दिनांक १८/१०/२००७ च्या परिच्छेद क्र. ३.१ नुसार अनुज्ञेय ५ टक्के सेवाशुल्कापोटी शासन नियुक्त यंत्रणेकडे उद्योग घटकांनी जमा करण्यात आलेल्या रकमेची तसेच या शासन निर्णयाद्वारे निर्धारित केलेला नोंदणी शुल्क/सेवा शुल्क/तपासणी शुल्क इ. रकमेची विभागणी ४% रक्कम शासन नियुक्त यंत्रणा व १% रक्कम जिल्हा उद्योग केंद्र अशी राहील. या निधीतून प्रस्तुत कामाच्या सुलभीकरणासाठी पायाभूत सोई व सुविधा, प्रशासकीय व कार्यालय खर्चाकरिता दोन्ही यंत्रणांनी वापर करावा.

८.४ वरील संपूर्ण कार्यपद्धतीचे संगणकीकरण शासन नियुक्त यंत्रणेद्वारे त्याच्या तरतूदीमधून करण्यात यावे. यासाठी शासनाकडून वेगळे अनुदान/निधी दिला जाणार नाही.

८.५ केंद्र शासनाच्या प्रचलित धोरणानुसार कोळसा वाटप प्रक्रिया सुलभ व पारदर्शक पद्धतीने होण्यासाठी तसेच गैरव्यवहार टाळण्यासाठी आवश्यक कार्यान्वयन सूचना देण्याचे अधिकार शासन नियुक्त यंत्रणेस राहतील.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६०७१३१५३८०३१११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay
Shamkant
Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Industry, Energy and Labour Department, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2016.07.14 16:03:10 +05'30'

**( संजय देगांवकर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. विरोधीपक्ष नेते, विधान परिषद व विधान सभा, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई.

२) राज्यातील सर्व संसद सदस्य.

३) सर्व सन्माननीय विधान सभा व विधान परिषद सदस्य.

४) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.

५) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.

६) मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

७) मा. मुख्य सचिवांचे, उप सचिव.

८) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.

९) सर्व विभागीय आयुक्त/सर्व महसुल विभाग.

१०) सर्व जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे)

११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म विकास महामंडळ मर्या., नागपूर.

१२) संचालक, भुविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.

१३) उद्योग सह संचालक, मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, अमरावती, औरंगाबाद व नागपूर. (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१४) सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व जिल्हे) (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१५) सर्व उपविभागीय अधिकारी, सर्व महसूल उपविभाग. (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१६) सर्व तहसिलदार (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१७) सर्व खनिकर्म अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१८) निवड नस्ती (उद्योग-७)

१९) विषय नस्ती (उद्योग-७).

ANNEXURE-I

<table>
<tr><td colspan="6">APPLICATION FORM NO.</td></tr>
<tr><td colspan="5">STATE APPROVED NODAL AGENCY<br><br>Address</td><td rowspan="2"></td></tr>
<tr><td colspan="5">APPLICATION FOR SUPPLY OF COAL TO SMALL AND MEDIUM SCALE UNITS<br>APPLICATIONS RECEIVED FROM UNITS WHOSE ANNUAL REQUIREMENT IS ABOVE 4200 MT. PER YEAR WILL NOT BE CONSIDERED</td></tr>
<tr><td rowspan="3">1</td><td rowspan="3">Name & Address of Units</td><td colspan="4">Office :</td></tr>
<tr><td colspan="4">Factory :</td></tr>
<tr><td colspan="4"></td></tr>
<tr><td rowspan="3">2</td><td rowspan="3">Name of Proprietor/<br>Partner/Director</td><td colspan="4">1)</td></tr>
<tr><td colspan="4">2)</td></tr>
<tr><td colspan="4">3)</td></tr>
<tr><td rowspan="3">3</td><td colspan="5">Telephone Nos. with STD code</td></tr>
<tr><td>Office :</td><td></td><td>Residence :</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>Mobile :</td><td></td><td>Fax :</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>4</td><td>Name of Contact person</td><td colspan="4"></td></tr>
<tr><td>5</td><td>PAN Card No.</td><td colspan="4"></td></tr>
<tr><td>6</td><td>Permanent SSI<br>Registration No. :</td><td></td><td>&DATE</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>7</td><td>Item for which registration is allotted by Inds. Dept.</td><td colspan="4"></td></tr>
<tr><td>8</td><td>Items Manufactured at present by the unit :</td><td colspan="4"></td></tr>
<tr><td>9</td><td>Yearly Production Capacity for the Item which units is manufacturing</td><td colspan="4"></td></tr>
<tr><td rowspan="3">10</td><td>Investment in Fixed<br>Assests</td><td colspan="4"></td></tr>
<tr><td colspan="2">A) Land Value in Rs. :</td><td colspan="3">B) Building Value in Rs.</td></tr>
<tr><td colspan="5">C) Plant & Machinery Value in Rs.</td></tr>
<tr><td rowspan="4">11</td><td colspan="2">a) TIN/VAT Registration No.:<br>Enclose TIN/VAT Regn. Certificate</td><td colspan="3">& DATE</td></tr>
<tr><td colspan="2">b) Income Tax paid in last three years Enclose copies of Income Tax return filed</td><td>Year</td><td colspan="2">Amount</td></tr>
<tr><td colspan="2"></td><td>Year</td><td colspan="2">Amount</td></tr>
<tr><td colspan="2"></td><td>Year</td><td colspan="2">Amount</td></tr>
<tr><td>12</td><td>Yearly requirement of coal</td><td colspan="4">MT</td></tr>
<tr><td>13</td><td colspan="2">Whether Quota has been sanctioned by Industries Department in past</td><td>YES</td><td colspan="2">NO</td></tr>
</table>

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 14 | If then letter L/No. Dt. | | Qty. Sanctioned | |
| 15 | Manpower Total: | Supervisor | Workers | |
| | | | i) skilled | |
| | | | ii) Semi Skilled | |
| | | | iii) Unskilled | |
| 16 | Capitals investment | i) Block Capital | | |
| | | ii) Working Capital | | |
| | | iii) Name of Bankers | | |
| 17 | Coal purchased in previous 2 years | 2012-13 | | |
| | | 2013-14 | | |
| | | | | |
| 18 | Information regarding use of coal in manufaturing of products by the unit(If required enclose separate sheet) | | | |
| 19 | INFORMATION REQUIRED TO BE FEELED BY BRICKS MANUFACTURES ONLY | | | |
| | A) Types of Bricks cline | | | |
| | B) NOC from local authority enclosed | | | |
| | C) Copy of 7/12 Extract from Talathi Enclosed | | | |
| | D) Land for cline is leased or owned (In case of leased land enclose copy of leased Agreement) | | | |
| | E) Mining leased enclosed (Period from ----------------- to -----------------) | | | |
| | F) Royalty paid in last three years | Year | Amount | Qty.in Brass |
| 20 | As per Coal Distribution Policy, consumer will have to enter into an Fuel Supply Agreement with State Approved Nodal Agency which will be on the lines of FSA agreement to be entered by State approved Nodal Agency with the Coal Company. Consumer will have to deposit amount of SD @ 5% of the value of annual requirement for which consumer intends to enter into agreement with state approved Nodal Agency and in case of default i.e. non—lifting of coal by the consumer as per agreement the amount of SD will be forfeited. Applications submitted without firm commitment for entering into agreement with State approved Nodal Agency along with SD will not be considered. | | | |

Date :

Place :

Signature

Name ___________________________

Seal

Applications are requested to submit applications duly filled in along with required documents on or before due date to Branch / Divisional Office State approved Nodal Agency in the District in which applicant units is located.

ANNEXURE-II

Affidavit on Rs.100/- Non Judicial Stamp Paper to be Filled by Applicant for Coal allotment /recommendation.

BEFORE THE EXECUTIVE MAGISTRATE _________________________

Or

Self Attested

Deponent Shri_________________________________________

aged about _______________________________years

Proprietor/Partner/Authorised Representative

of M/s.__________________________________________________

Having its office at ________________________________________

I/We________________________________________designation________________

Authorized representative/person on behalf of the applicant industry mentioned above, hereby solemnly declare as follows :-

1. That my/our industrial unit is registered as Medium/Small/Micro under (Name of the Act) and it is in regular operation in manufacturing of ____________ having SSI registration no._____________dt.____________.
2. That I/We have obtained necessary License/No Objection Certificate/clearance from the appropriate authorities to operate the said unit for the manufacture of above mentioned product. Copies of License, No Objection Certificate is enclosed.
3. That our unit has lifted____ M/Ts. of coal during the last two financial years.i.e.2012-13 &2013-14 period.
4. That our unit has actually consumed______M/Ts of coal for our production between 01.04.2013 and 31.03.2014.
5. That whatever quantity of coal will be released by state Appointed Nodal Agency to my/our unit, I/We will left the same and utilised the entire quantity of coal in our factory and for our own production only.
6. I/We undertake to lift the material at our cost from any colliery as alloted by State Appointed Nodal Agency and we shall not have any choice as to the colliery and grade of coal.

7. That the delivery of material will be given to our authorised representative. Once the authorised representative acklowledges receipt of coal, no complaints regarding of quantity/quality will be entertained by State Appointed Nodal Agency.
8. I/We agree to make payment of estimated cost of coal allotted to us, to state Appointed Nodal Agency by DD or Bankers cheque or by ECS/RTGS only along with bank confirmation certificate in prescribed format. It is our responsibility to make said payment before due dated GIVEN IN State Appointed Nodal Agency's offer latter filling with quantity offered shall be deemed to be lapsed.
9. I/We shall pay service charges of 5 % of the basic cost of the coal supplied & other fees as decided by Government of Maharashtra to State Appointed Nodal Agency.
10. I/We here by confirm that coal shall be supplied to us only on advance payment. At the end of the relevant period, if any amount paid by us towards the supply of coal stands to the credit of our account being unutilized amount State Appointed Nodal Agency shall refund unutilized amount as and when received from the respective coal company. I/We further state that no interest shall be payable us on such unutilized amount standing at the credit of our account. I/We undertake to enter into agreement with State Appointed Nodal Agency containing detailed terms and condition regarding the supply of coal.
11. State Appointed Nodal Agency is only a channelling Agent as made clear by the Govt. We specially understand that State Nodal Agency shall not be responsible for quality, quantity, loss in transit, change in Govt.Policy, non availability of coal companies. We also understand that State Appointed Nodal Agency shall not be responsible any change in coal policy and its resultant consequences.
12. That I/We shall maintain all necessary records of coal received from State Appointed Nodal Agency it's consumption, production, sales, electricity consumption, workers wages etc. and will make them available to the Officer of State Appointed Nodal Agency / any other officer authorized by Govt. and also submit utilization report of coal quarterly in prescribed format. I also undertake the responsibility of putting all relevant information prescribed by State Government on Website of State Nodal Agency. I/We Indemnify State

Appointed Nodal Agency / Government that the failure of submission of utilization report / certificate will result in suspending / cancellation of coal quota allotted to our unit without prejudice to above State Appointed Nodal Agency / Government be at liberty to initiate appropriate legal processing in case of misutilisation non submission of utilization or breach of any terms & conditions of FSA.

Signed on this ____________day of _____________20____at _____________

Witness

Name
Signature

Signature of Deponent :
Name :
Authorised Proprietor/ :
Partner/Director
Seal of the Unit :

---------------------------------------------------------------------------------------------------------------

**<u>V E R I F I C A T I O N</u>**

Verified that the contents of above paras 1 to 12 are true and correct and signed on this ____________ day of __________ 20________ at ____________

Signature of Deponent

(__________________)

I Know and identify the deponent.
Advocate

Before me

(Before Notary or magistrate)

**ANNEXURE-III**

**COAL QUALITY & GRADE CERTIFICATE**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 1 | Name of the unit | | | |
| 2 | Address | | | |
| 3 | Items manufactured | | | |
| 4 | Production/manufacturing capacity by month | Item | | Quantity |
| 5 | Present Utilisation of total production/ manufacturing capacity by unit p.m. | Item | | Quantity |
| 6 | No.of working shifts on the date of issue of certificate | | | |
| 7 | Whether item manufactured requires coal in manufacturing process | | | |
| 8 | Whether coal is used as raw material or fuel | | | |
| 9 | If used, as Raw Material then quantity required p.m. and also specify the grade of coal in use. | | | |
| 10 | If used, as Raw Material then quantity required per month. | | | |
| 11 | If used, as fuel no.of boilers/furnance installed | | | |
| 12 | Capacity of boiler/furnance installed | | | |
| 13 | Whether boiler/furnance is coal Fired/oil fires/electrical furnance, please specify. If using electricity load sanctioned & present consumption. | | | |
| 14 | If electricity is used by unit then Load sanctioned & present Consumption. | | | |
| 15 | Consumption of coal as fuel for boiler/finance p.m. in M/Ts. | | | |
| 16 | In case boiler is not coal-fired then whether coal can be used for firing in present conditions. | | | |
| 17 | Temperature required in manufacturing process for product manufactured. | | | |
| 18 | Turnover in last three years. | **(Rs. in lakh)** | | |
| | | | | |
| 19 | Production details for last three years for only manufacturing products only, where coal is used. | | | |
| 20 | Requirement of coal in M/T.per unit of item produced/manufactured. | | | |
| 21 | Grade of coal and quantity recommended per month. | | | |
| 22 | Remarks of Authority. | | | |

DATE :

PLACE : **SEAL & SIGNATURE OF AUTHORITY**

**ANNEXTURE-IV**

## FORMAT OF INFORMATION TO BE SUBMITTED TO THE DISTRICT LEVEL DISTRIBUTION COMMITTEE FOR INDUSTRIAL UNITS

| Name of the unit | Documents submitted along with application | | | | | | | | | | | | | Recommendation by inspecting agency | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | SSI REG | Affidavit | Last year coal allotment cert. | Production capacity cert. | S.T. Regn. | List of plant & machinery | 3 years B/S | PAN CARD | Aadhar card | 3 Moths electricity bills | Lease agree ment | Processing & Insp. Charges paid (Rs.) | MPCB License if applicable | Coal recommended p.m.(M/Ts) | Grade of coal | Remarks of the committee |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 |
| | | | | | | | | | | | | | | | | |

**SEAL AND SIGNATURE OF AUTHORITY**

## FORMAT OF INFORMATION TO BE SUBMITTED TO THE DISTRICT LEVEL DISTRIBUTION COMMITTEE FOR BRICKS UNITS

| Name of the unit | SSI REG | Affidavit | Documents submitted along with application | | | | | | | | | | | | | | | | Coal recommended by committee M/Ts. Per month | Remarks of the committee |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | Last year coal allotment cert. | S.T. Regn | PAN CARD | Aadhar card | leased AGMN for space taken on lease | Mining lease agreement for pmt lease | Final order copy for pmt lease | Mining lease permission for tep lease | Royalty Challan | Processing & Insp. Charges paid (Rs.) | Period of mining lease | | Permission for mining in brass | Royalty paid dur.3 years | | | | |
| | | | | | | | | | | | | | From | To | | | | | | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 | 19 | 20 | 21 |
| | | | | | | | | | | | | | | | | | | | | |

**SEAL AND SIGNATURE OF AUTHORITY**

**ANNEXURE - V**

**Coal Inspection Report**

| | | |
|---|---|---|
| 1 | Name of the Unit | M/s |
| 2 | Address | |
| 3 | In case of bricks unit copy of 7/12 is submitted | Yes/No |
| 4 | Coal supplied by State approved Nodal Agency for the period from--------- to--------<br>(as per statement provided by State approved Nodal Agency) | |
| 5<br><br>A<br><br>B<br><br><br>C | As per the coal register maintained by unit<br><br>Opening Balance at the start of month-----<br><br>Coal received by unit<br>from ------ to -------<br><br>Closing Balance at the end of the month-------------- | |
| 6 | Total consumption of coal<br>from------------ to------------<br>(A+B+C) | |
| 7 | Production during the year<br>from----------- to -----------<br>(As per the stock register maintained by the unit) | |
| 8 | Coal consumption per unit of production as per Report of Technical Agency. | |
| 9 | If electricity is used by unit of then load sanctioned & present consumption. | |
| 10 | consumption of coal during the period<br>from ------------ to -------------<br>(worked out from 6 & 7) | |
| 11 | Difference in the Coal consumption as mentioned at Sr.No.5 & 8 | |
| 12 | Remarks of Committee. | |

Date :

Place :

SIGNATURE OF INSPECTING TEAM MEMBERS

# ANNEXURE VI

## उद्योग घटकाने ठेवावयाच्या कोळसा वापराबाबतच्या नोंदवहीचा नमुना

उद्योग घटकाचे नाव व कोड नं. :- महिना :-

पत्ता :-

उत्पादनाचा तपशील :-

| शासन नियुक्त यंत्रणेकडे जमा रक्कम व तपशील | महिन्याच्या सुरुवातीला उपलब्ध कोळसा (मे. टन) | तारीख | शासन नियुक्त यंत्रणेकडून प्राप्त कोळसा | | | | | | कोळसा वापर | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | प्राप्त झालेला कोळसा (मे. टन) | ट्रक नं. | शासन नियुक्त यंत्रणेचा डि.ओ.नं. | डि. ओ. तारीख | डि. ओ. ची मात्रा | कुठल्या खाणीतून कोळसा प्राप्त झाला | वापरलेली मात्रा (मे. टन) | शिल्लक कोळसा (मे. टन) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| | | | | | | | | | | |

सही

नाव :- ______________________________

शिक्का